**व्यवसाय शिक्षण संचालनालयांतर्गत व्यवसाय अभ्यासक्रमाकडील विद्यार्थ्यांच्या एका संस्थेतून दुसऱ्या संस्थेत होणाऱ्या प्रवेशास /बदलीस मान्यता देण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्रमांक : व्हीओसी - २०१०/प्र.क्र.२६६/व्यशि - ४,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १ ऑगस्ट, २०११.

**संदर्भ** : संचालक ( व्यवसाय शिक्षण ) यांचे पत्र क्रमांक ८/व्हीओसी/२०१०/२२०३/३७७,
दिनांक : २३ जुलै, २०१०

**प्रस्तावना :-** माध्यमिक शाळा संहिता सुधारीत आवृती १९८६ विभाग ३, नियम क्रमांक २०.१ नुसार नवीन वर्षाकरीता शाळा प्रवेश सुरु झाल्यानंतर साधारणत: २० दिवसांच्या कालावधीत प्रवेश दिला जातो. या कालावधीनंतर विद्यार्थ्यांच्या पालकांची एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी बदली झाल्यामुळे, विद्यार्थ्यांच्या आजारपणामुळे, कोणतीही दु:खद घटना घडल्यामुळे किंवा विद्यार्थ्यांच्या वास्तव्यातील बदलामुळे एका संस्थेतून दुसऱ्या संस्थेत विद्यार्थ्यांना प्रवेश घेणे भाग पडते, अशा प्रकरणात शाळा प्रवेशाचा कालावधी संपल्यानंतरही प्रवेश देण्याची तरतूद आहे. अनेकदा अपवादात्मक परिस्थितीतील हे प्रवेश नियमित मंजूर क्षमतेच्या मर्यादेबाहेर असतात. अशा परिस्थितीत विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होवू नये तसेच पालकांवर आर्थिक भूर्दंड पडू नये किंवा विद्यार्थ्यांनी त्यांचे शिक्षण अर्धवट सोडू नये या उद्देशाने व्यवसाय अभ्यासक्रमाकडील विद्यार्थ्यांच्या वरील अपवादात्मक कारणामुळे / परिस्थितीमुळे विद्यार्थ्यांना एका संस्थेतून दुसऱ्या संस्थेत प्रवेश घ्यावा लागल्यास त्यांच्या प्रवेशास मान्यता देणेबाबतचे व मान्यतेचा स्तर निश्चितीबाबतचे धोरण ठरविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :** अपवादात्मक परिस्थितीत विद्यार्थी / पालकाच्या स्थलांतरामुळे व्यवसाय शिक्षण विभागातील शासनमान्य संस्थेतील, व्यवसाय अभ्यासक्रमाकडील विद्यार्थ्याला दुसऱ्या ठिकाणच्या संस्थेत प्रवेश घ्यावा लागत असेल तर असे प्रवेश हे जिल्हयाअंतर्गत, विभागाअंतर्गत, व विभागाबाहेरील (राज्याअंतर्गत) असल्यास या प्रवेशास मान्यता देण्याचे अधिकार अनुक्रमे जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालये, व संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य यांना या शासन निर्णयान्वये देण्यात येत आहेत.

असे प्रवेश एका शासकीय संस्थेतून दुसऱ्या शासकीय संस्थेत, अशासकीय अनुदानित संस्थेतून अशासकीय अनुदानित संस्थेत, व अशासकीय विनाअनुदानित संस्थेतून अशासकीय विनाअनुदानित संस्थेत अशा तीनही प्रकारच्या संस्थामध्ये करता येतील. तथापि, विद्यार्थ्यांची इच्छा असल्यास ज्या ठिकाणी प्रवेश घ्यावयाचा आहे त्या ठिकाणी शहरात, गावात, संस्थेत विद्यार्थी ज्या मुळ प्रकाराच्या संस्थेत आहे अशा संस्था नसल्यास शासकीय संस्थामधून अशासकीय अनुदानित संस्थेत किंवा शासकीय संस्थेतून विना अनुदानित संस्थेत विद्यार्थी जादा शैक्षणिक शुल्क भरुन प्रवेश घेण्यास तयार असेल तर त्यास प्रवेश देता येईल.

विद्यार्थ्यांला अपवादात्मक परिस्थितीत दुसऱ्या संस्थेत प्रवेश घ्यावा लागत असेल त्यावेळेस त्यांने संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांच्याकडे याबाबत अर्ज करावा व अर्जा सोबत दोन्ही संस्थेचे प्रवेशास हरकत नसल्याचे "ना हरकत प्रमाणपत्र" तसेच ज्या कारणामुळे प्रवेश घेणे भाग पडत आहे त्या कारणाचे आवश्यक ते पुरावे सोबत जोडावेत. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकाऱ्यांनी सदर अर्जाची छाननी करुन प्रकरणपरत्वे स्वतःच्या स्तरावर प्रवेशाबाबत निर्णय घ्यावा किंवा सदर प्रकरण मान्यतेसाठी सहसंचालक प्रादेशिक कार्यालय किंवा प्रादेशिक कार्यालया मार्फत संचालक ( व्यवसाय शिक्षण ) यांच्या कडे पाठवावे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असुन, त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०८०१११२८३९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( शोभा वि. पत्की )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) प्रभारी संचालक ( व्यवसाय शिक्षण ) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई - १
२) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालय, मुंबई,पुणे,नाशिक,अमरावती,नागपूर, औरंगाबाद ( संचालनालयामार्फत )
३) सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, ( संचालनालयामार्फत )
४) मा. मंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण ) यांचे खाजगी सचिव.
५) संबंधित सर्व संस्था संचालक संचालनालयामार्फत,
६) शालेय शिक्षण विभाग- माशि - २, मंत्रालय मुंबई - ३२
७) निवड नस्ती.

D:\Patki\G.R\g.r.doc